२०१५०४२२१७०७२७१०२७

(२९९)

निंबादेवी लघु पाटबंधारे योजना
ता.यावल जि.जळगाव
या योजनेस द्वितीय सुधारित
प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक : लपायो २००७/(२८०/२००७) खारभूमी
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :-१४/११/२००७

**पहावे :-** १) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांचे पत्र क्र.कासं/प्रवि-४/सुप्रमा/४६/ल.पा.यो/२००२, दिनांक १.११.२००२

२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांचे पत्र क्र.कासं/तां-२/८४९/सन २००७/दिनांक ३०.४.२००७

**प्रस्तावना :-**

निंबादेवी लघु पाटबंधारे योजना ता.यावल जि.जळगाव या योजनेस शासन निर्णय क्रमांक लपायो १६९३/४६९/९३/खारभूमी दिनांक २९.१०.९३ अन्वये रुपये १६३.९ लक्ष रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तसेच महामंडळ निर्णय क्र.तपाविमं/कासं/प्रवि-४/सु.प्र.मा./४६/लपायो/२००२, दिनांक १.११.२००२ अन्वये रुपये ५१८.२१ इतक्या रकमेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. या योजनेचे घळभरणीचे काम पूर्ण झालेले असून सांडवा, भिंत, विमोचक व पक्ष भिंतीचे काम पूर्ण झालेले आहे. कालवा २.०१ कि.मी. लांबीचा असून पैकी ६६० मी.लांबीचे काम पूर्ण झालेले आहे. पुच्छ कालव्याचे खोदकाम व त्याची संलग्न कामे तसेच कालव्याचे काम करावयाचे आहे. दरसुचीच्या दरातील वाढ, भूसंपादन, संकल्पचित्र बदल, अंदाजपत्रकातील नवीन तरतूद व अनुषंगिक खर्च या कारणामुळे योजनेच्या किंमतीत वाढ अपेक्षित असल्याने सन २००५-२००६ च्या दरावर आधारीत रुपये ७,२१,८०,८९१/- किंमतीच्या प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांच्याकडून प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंबंधात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

आता या शासन निर्णयान्वये निंबादेवी लघु पाटबंधारे योजना ता.यावल जि.जळगाव या योजनेस सन २००५-२००६ वर्षाच्या दरसूचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रुपये ७,२१,८०,८९१/- (रुपये सात कोटी, एकवीस लक्ष, ऐंशी हजार, आठशे एक्याण्णव फक्त यापैकी रुपये ५,८१,६८,६३६/- कामाप्रित्यर्थ व रुपये १,४०,१२,२५५/- अनुषंगिक खर्च) रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये देण्यात आला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-९, मुख्य लेखाशीर्ष "४७०२ लहान पाटबंधारे-यावरील भांडवली खर्च ८०० इतर खर्च (१) बांधकामे ल.पा.योजना, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व त्यावरील मंजूर अनुदानातून परस्पर भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय पाटबंधारे व वित्त विभाग क्र.ए.पी.एच.१०७३/३२६५३/ई(३) दिनांक १५.७.१९७४ मधील परि.३ व शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र.संकीर्ण १०९९/१२६/९९/मोप्र-२ दिनांक १८.६.१९९९ मधील तरतूदीनुसार आंतरवित्त सल्लागार व उपसचिव जलसंपदा विभाग यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्राप्त करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता (१७/०७) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

( रा.च.हुमणे )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलिपी,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा) मुंबई / नागपूर
कार्यकारी संचलाक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, जळगाव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगाव
अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रायल, मुंबई
जिल्हाधिकारी, जळगाव
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रायल, मुंबई (२ प्रती)
संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई
कार्यासन, संग्रहार्थ.

C:\Documents and Settings\hp230483\My Documents\Maahegoen-order-HHP.doc

शासन निर्णय क्रमांक लपायो २००७/६४२/(२८०/२००७) खारभूमी दिनांक ४/१[illegible]/२००७
चे परिशिष्ट

## निंबादेवी लघु पाटबंधारे योजना ता.यावल, जि.जळगाव
## अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | शिर्ष / उपशिर्ष | रक्कम (रुपये लक्ष) | | एकूण रुपयात |
|---|---|---|---|---|
| | | शिर्षकामे | मुख्य व शाखा कालवे | |
| १. | 'ए' प्राथमिक | २२९१९२ | ३२१०२१ | ५५०२१३ |
| २. | 'ब' (भूसंपादने) | १७६३००० | ९१२५५६ | २६७४५५६ |
| ३. | 'सी' मुख्य कामे | ४७३५५१७० | -- | ४७३५५१७० |
| ४. | 'डी' विमोचक | २२२१४४७ | ३७४५०० | २५९५९४७ |
| ५. | 'ई' फॉल | -- | १७९७४७६ | १७९७४७६ |
| ६. | एफ आरएचटी वर्क्स | -- | १६२००० | १६२००० |
| ७. | जी पूल (सीटी क्रॉसिंग) | -- | १८३०६४ | १८३०६४ |
| ८. | एच्च एस्केप | -- | ४२००० | ४२००० |
| ९. | 'के' इमारती | १२०१३० | -- | १२०१३० |
| १०. | एल मातीकाम | -- | ५३१५५८ | ५३१५५८ |
| ११. | एम वृक्षारोपन | १०००० | -- | १०००० |
| १२. | 'ओ' संकिर्ण | ५०००० | ५३००० | १०३००० |
| १३. | 'पी' देखभाल | १३०००० | ५३००० | १८३००० |
| १४. | 'आर' दळणवळण | ११६३२२ | -- | ११६३२२ |
| | वितरिका | -- | १७४४२०० | १७४४२०० |
| | कामाप्रित्यर्थ किंमत | ५१९९५२६१ | ६९७३३७५ | ५८९६८६३६ |
| | आनुषंगिक खर्च (२५.२५ टक्के भूसंपादन वगळून) | | | १४०१२२५५ |
| | योजनेची एकूण किंमत | | | ७२१८०८९१ |

## ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | ३०६ हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा | २४२८.२५ सघमी |
| पाणीसाठयाची प्र.स.घ.मी.किंमत (रु.) | २९७२५ < २९७३१ (मापदंडात बसते) |
| लाभव्यय गुणोत्तर | १.३५ > १.०० (मापदंडात बसते) |